महानगरपालिका व नगरपरिषदांच्या सार्वत्रिक निवडणुकांकरिता त्या क्षेत्रातील दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापनांमध्ये कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी भरपगारी सुट्टी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
क्रमांक:- संकीर्ण-२०१०/प्र.क्र.६९/कामगार-९
दिनांक:- ६ एप्रिल, २०१०

## परिपत्रक

राज्य निवडणूक आयोगाने नवी मुंबई, औरंगाबाद महानगरपालिका तसेच अंबरनाथ व कुळगांव-बदलापूर, जिल्हा ठाणे व मोवाड, जिल्हा- नागपूर या नगरपरिषदांच्या सार्वत्रिक निवडणूका दिनांक ११ एप्रिल, २०१० रोजी घेण्याचे ठरविले आहे.

राज्य निवडणूक आयोगाने लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५१ मधील कलम १३५-ब मधील तरतुदीचे काटेकोर पालन करणेबाबत सूचना दिलेल्या आहेत. लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५१ मधील कलम १३५-ब नुसार निवडणूकीच्या दिवशी दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना यांचेकडून कामगारांना भरपगारी सुट्टी देणे बंधनकारक आहे. जेणेकरुन त्या दिवशी सर्व कामगार मतदानाचा हक्क बजावून शकतील. भारत निवडणूक आयोगाच्या व राज्य मुख्य निवडणूक अधिकाऱ्यांच्या असे निदर्शनास आले आहे की, लोकसभा सार्वत्रिक निवडणूक २००९ च्या काळात निवडणूकीच्या दिवशी पुष्कळशा दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापनांनी भरपगारी सुट्टी दिली नसल्यामुळे संबंधीत कामगार निवडणूकीच्या दिवशी आपला मतदानाचा हक्क बजावू शकले नाहीत. ही बाब गंभीर आहे.

या पार्श्वभूमीवर शासन आदेश देत आहे की, दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना यांना सूचना देण्यात येत आहेत की,

१) रविवार, दिनांक ११ एप्रिल, २०१० रोजी सर्व दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना यात कामगारांना सदर निवडणूकीच्या दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भरपगारी सुट्टी देण्यात यावी.

२) लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५१ च्या तरतुदींचे एखाद्या नियोक्त्यांने/मालकाने भंग केल्यास अशा नियोक्त्या/मालकांवर दंडात्मक कारवाई करण्यात येईल.

३) लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५१ मधील कलम १३५-ब (४) नुसार मतदानाच्या दिवशी अनुपस्थितीमुळे धोका अथवा मोठया प्रमाणावर नुकसान होईल अशा उद्योगांतील कामगार मतदारांना हे परिपत्रक लागू होणार नाही.

सर्व दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापनांच्या मालक/आस्थापनांनी वरील तरतुदींचे योग्य अनुपालन होईल, याची काटेकोरपणे खबरदारी घ्यावी.

(कविता गुप्ता)
सचिव (कामगार)

उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधीत आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित:-

प्रधान सचिव(उद्योग),उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
अवर सचिव, कार्यासन-५, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकिय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०००३२.
कामगार आयुक्त, कॉमर्स सेंटर, ताडदेव, मुंबई.
संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, ताडदेव, मुंबई.
संचालक, बाष्पके, संचालनालय, भायखळा, मुंबई.
संचालक, कै. नारायण मेघाजी लोखंडे, महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परेल, मुंबई.
कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, एलफिन्स्टन रोड, मुंबई.
आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, नवी मुंबई.
आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका, औरंगाबाद.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
कामगार विभागातील सर्व कार्यासने
निवडनस्ती (कामगार-९)